**"मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" व गरजू महिलांसाठी "ई- पिंक रिक्षा" या योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने शासनस्तरावर मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक- मबावि २०२४/प्र.क्र.१५१/कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ८ जुलै, २०२४

**संदर्भ:-**१. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.९६/कार्या-२, दि.२८.०६.२०२४ व दि.०३.०७.२०२४.
२. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.१५६/कार्या-२, दि.०५.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील महिलांच्या आर्थिक स्वातंत्र्यासाठी आणि त्यांच्या आरोग्य आणि पोषणात सुधारणा करण्यासाठी आणि कुटुंबातील त्यांची निर्णायक भूमिका मजबूत करण्यासाठी महाराष्ट्र राज्यात "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" योजना राबविण्याबाबत शासन निर्णय दि.२८.०६.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दि.०२.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेच्या दि.२८.०६.२०२४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये अंशत: सुधारणा करण्याचा सर्वोनुमत्ते निर्णय घेण्यात आला होता. त्यानुषंगाने सुधारणा करुन दि.०३.०७.२०२४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेबाबत चर्चा करण्यासाठी दि.०२.०७.२०२४ रोजी मा.मुख्यमंत्री महोदयांचे समिती कक्ष, विधानभवन, मुंबई येथे बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांनी अर्थसंकल्पिय भाषणामध्ये महिलांसबंधित योजना घोषित केल्या आहेत. सदर योजनांच्या प्रभावी अंमलबजावणी करताना वेळोवेळी येणाऱ्या प्रशासकीय तसेच तांत्रिक अडी-अडीचणीचे तात्काळ निराकरण करण्यासाठी शासनस्तरावर मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली विविध विभागाच्या सचिवांचा समावेश असलेली "Empowered committee" गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या विभागाशी संबंधित "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" व गरजू महिलांसाठी ई- पिंक रिक्षा उपलब्ध करुन देणे व इतर घोषणांचा समावेश आहे.

दि.०२.०७.२०२४ रोजी बैठकीत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सदर "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" व “गरजू महिलांसाठी ई- पिंक रिक्षा उपलब्ध करुन देणे” या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी करताना वेळोवेळी येणाऱ्या प्रशासकीय तसेच तांत्रिक अडी-अडीचणीचे तात्काळ निराकरण करण्यासाठी शासनस्तरावर मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली विविध विभागाच्या सचिवांचा समावेश असलेली “Empowered committee” गठीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने “Empowered committee” गठीत करण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

“मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण” व गरजू महिलांसाठी “ई- पिंक रिक्षा” या योजनांच्या प्रभावी अंमलबजावणी करताना वेळोवेळी येणाऱ्या प्रशासकीय तसेच तांत्रिक अडी-अडीचणीचे तात्काळ निराकरण करण्यासाठी शासनस्तरावर मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली विविध विभागाच्या सचिवांचा समावेश असलेली खालीलप्रमाणे **“Empowered committee”** गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | अपर मुख्य सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८ | अपर मुख्य सचिव, परिवहन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९ | प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १० | प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ११ | प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १२ | सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची आवश्यकतेनुसार बैठक आयोजित करण्यात येईल.

**समितीची कार्यकक्षा :-**

१. सदर "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" व गरजू महिलांसाठी “ई- पिंक रिक्षा” या योजनांच्या प्रभावी अंमलबजावणी करताना येणाऱ्या प्रशासकीय तसेच तांत्रिक अडी-अडीचणीचे तात्काळ निराकरण करणे.

२. योजनेवर देखरेख व संनियंत्रण करणे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०५१२०५१७६५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANUP KUMAR YADAV

Digitally signed by ANUP KUMAR YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5f3908d24b2568f3b31ae7a2607b77e47b9cced8530762f703728fbf48d2b4f9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=04D0A29A400CB59ACDA95D417719F74B7810596B06FB1A4D38C8EA417B170BB0, cn=ANUP KUMAR YADAV
Date: 2024.07.09 17:58:36 +05'30'

**(डॉ.अनुप कुमार यादव)**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/सदस्य, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. विभागीय आयुक्त (सर्व),
१२. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
१३. जिल्हाधिकारी (सर्व),
१४. महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१५. महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१८. सह सचिव, उपसचिव, अवर सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. सर्व सह आयुक्त/उप आयुक्त / विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२०. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालय पुणे मार्फत),
२१. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालय पुणे मार्फत),
२२. महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने),
२३. निवड नस्ती, कार्यासन-२